जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत "आव्हान निधी (Challenge Fund)" स्थापित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्र. डिएपी-२०२१/प्र.क्र.८३/का-१४८१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक:- ३० सप्टेंबर, २०२१

वाचा- १) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.जिनिस-१०९९/प्र.क्र.२९/का-१४४४, दि.१ जून, १९९९.
२) नियोजन विभाग शासन निर्णय क्र.जिवायो-१००७/प्र.क्र.३९/का-१४४४, दि.१६ फेब्रुवारी, २००८.
३) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. जिवायो-१००९/प्र.क्र.२०५/का-१४८१,दि.१७ एप्रिल, २०१०.

प्रस्तावना-

"महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम,१९९८" च्या तरतूदींनुसार जिल्हा नियोजन समित्यांकडे पंचायती व नगर पालिका यांनी तयार केलेल्या विकास योजना एकत्रित करुन संपूर्ण जिल्ह्यासाठी विकास योजनेचा आराखडा तयार करण्याची जबाबदारी देण्यात आली आहे.

२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक जिवायो-१००९/प्र.क्र.२०५/का-१४८१ दि १७.०४.२०१० अन्वये निश्चित करण्यात आलेल्या सुत्राप्रमाणे म्हणजे (१) जिल्ह्याचे क्षेत्रफळ -३०% (२) जिल्ह्याची सर्वसाधारण लोकसंख्या-३०% (३) जिल्ह्याची ग्रामीण सर्वसाधारण लोकसंख्या-२०% व (४) मानव विकास निर्देशांक-२०% या सुत्राप्रमाणे विभागणी करून जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत जिल्हानिहाय निधी उपलब्ध करुन दिला जातो. तथापि, जिल्हा नियोजन समितीकडून सादर करण्यात येणाऱ्या जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) च्या आराखडयामध्ये वाढीव / अतिरिक्त निधी उपलब्ध करून देण्याची मागणी दरवर्षी प्राप्त होत असते. या पार्श्वभूमीवर प्रत्येक जिल्हा नियोजन समितीने उत्कृष्टपणे काम करुन त्यांच्या जिल्ह्याचा अधिकाधिक गतीने विकास साध्य करता यावा या उद्दिष्टपूर्ती करीता "अतिरिक्त निधी" ची संधी प्राप्त व्हावी म्हणून प्रत्येक महसूल विभागातील एका जिल्हा नियोजन समितीला जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत प्रोत्साहनपर रु.५०.०० कोटी "अतिरिक्त निधी" उपलब्ध करुन देण्याकरीता नियोजन विभाग स्तरावर "आव्हान निधी (Challenge Fund)" स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

१. महसूली विभागांतून उत्कृष्ट काम करणाऱ्या प्रत्येकी एका जिल्हा नियोजन समितीला सन २०२२-२३ या आर्थिक वर्षापासून जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत प्रोत्साहनपर

रु.५०.०० कोटी "अतिरिक्त निधी" उपलब्ध करुन देण्याच्या दृष्टीने एकूण रु.३००.०० कोटी "आव्हान निधी (Challenge Fund )" चिन्हांकित करुन नियोजन विभाग स्तरावर ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. महसूली विभागांतून उत्कृष्ट काम करणाऱ्या प्रत्येकी एका जिल्हा नियोजन समितीला या "आव्हान निधी (Challenge Fund )" द्वारे जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत "परिशिष्ट-अ" मध्ये दर्शविलेल्या निकषांच्या आधारे रु.५०.०० कोटी "अतिरिक्त निधी" उपलब्ध करुन देण्यात येईल.

३. महसूली विभागांतून उत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा नियोजन समितीसाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत प्रोत्साहनपर "आव्हान निधी (Challenge Fund)" रु.५०.०० कोटी "अतिरिक्त निधी" म्हणून मंजूर करण्याच्या प्रयोजनासाठी संबंधित "विभागीय आयुक्त(Divisional Commissioner)" यांच्या अध्यक्षतेखाली "विभागीय निवड समिती" घटीत करण्यात येत असून या समिती मध्ये (i) उप आयुक्त (विकास),विभागीय आयुक्त यांचे कार्यालय, ii) उप आयुक्त (आदिवासी विकास),अपर आयुक्त यांचे कार्यालय, (iii) प्रादेशिक उप आयुक्त (समाज कल्याण) व (iv) प्रादेशिक सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, हे सदस्य असतील. विभागीय निवड समितीचे "सदस्य सचिव" म्हणून "उप आयुक्त (नियोजन)" हे काम पाहतील.

४. जिल्हा नियोजन समितीच्या कार्याच्या मूल्यांकनासाठी कृती कालावधी हा विद्यमान आर्थिक वर्षालगतचे मागील आर्थिक वर्ष म्हणजे "स्पर्धा वर्ष (Competition Year)" असेल. "स्पर्धा वर्ष (Competition Year)" आर्थिक वर्ष अखेर मार्च महिन्यात संपुष्टात आल्यानंतर व नविन आर्थिक वर्षातील एप्रिल महिना अखेर पर्यंत महसूली विभागातील सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती (District Collector & Member Secretary, District Planning Committee) यांनी त्यांचे "विभागीय आयुक्त (Divisional Commissioner)" यांचेकडे "आव्हान निधी (Challenge Fund)" करीता रू.५०.०० कोटी "अतिरिक्त निधी" मिळण्या करीता प्रस्ताव सादर करावेत. "विभागीय आयुक्त (Divisional Commissioner)" यांच्या अध्यक्षतेखालील "विभागीय निवड समिती" कडून प्राप्त प्रस्तावांची प्राधान्याने व शक्यतो १५ दिवसात सखोल छानणी करुन जिल्हयांची एक निवड यादी (Select List) तयार केली जाईल. तदनंतर आवश्यक असल्यास जिल्हा नियोजन समिती कार्यालयांना "उपआयुक्त (नियोजन)" यांचे मार्फत पुढील १५ दिवसात जिल्हा स्तरावर भेटी देऊन प्रत्यक्ष अभिलेखाची पडताळणी करण्यात येईल. "विभागीय आयुक्त (Divisional Commissioner)" यांचे कडून महसूल विभागातील एका जिल्हा नियोजन समितीने "स्पर्धा वर्षा (Competition Year)" मध्ये केलेले कामकाज सर्वात उत्कृष्ट असल्याची शिफारस दिनांक ३१ मे अखेर पर्यंत नियोजन विभागास सादर करता येईल.

५. महसूल विभागातून उत्कृष्ट काम करणाऱ्या एका जिल्हा नियोजन समितीस "आव्हान निधी (Challenge Fund)" साठी पात्र होण्याकरीता "परिशिष्ट-"अ" मधील नमूद एकूण ११ निकषांपैकी किमान ७५% निकषांवर (८ निकष) आधारीत गुण मिळविणे आवश्यक असेल, आणि अशाप्रकारे एकत्रितपणे किमान ६०% गुण प्राप्त झाल्यास संबंधित जिल्हा नियोजन समितीस पात्र समजण्यात

येईल. तथापि, महसूल विभागात किंवा काही जिल्ह्यांमध्ये प्रशासकीय कामकाजावर प्रदिर्घ काळ विपरीत परीणाम करणाऱ्या घटना जसे नैसर्गिक आपत्ती अथवा इतर अपवादात्मक परिस्थिती उदभवल्यास उपरोक्त निर्दीष्ट ६०% गुणांचे किमान निकषांमध्ये शिथिलता करण्यासंदर्भात "विभागीय आयुक्त (Divisional Commissioner)" यांचेकडून नियोजन विभागास प्रस्ताव सादर केला गेल्यास त्या बाबतीत विचार करून अशा प्रसंगी "आव्हान निधी (Challenge Fund)" प्रदान करण्याबाबत उचित निर्णय घेण्यात येईल.

६. वित्त विभागाचे अनौ. संदर्भ क्र.३६८, दि.०६/०९/२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून प्रस्तुत शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००९३०१३३५१६५४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.10.11 13:39:06 +05'30'

**(सं. ह. धुरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य
१०.मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११.मुख्य सचिव, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
१२.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१३.प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षक), मुंबई/नागपूर
१४.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (सर्व) मंत्रालय, मुंबई
१५.सर्व विभागीय आयुक्त, कोकण,पुणे,नाशिक,औरंगाबाद,अमरावती,नागपूर

१६.अपर आयुक्त (आदिवासी विकास), ठाणे,नाशिक,अमरावती,नागपूर

१७.नियोजन विभागाचे उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, (सर्व) मंत्रालय, मुंबई

१८. जिल्हाधिकारी, (सर्व)

१९. जिल्हा परिषदांचे, मुख्य कार्यकारी अधिकारी, (सर्व)

२०.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई

२१.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

२२.उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर

२३.उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर

२४.प्रादेशिक उप आयुक्त, (समाज कल्याण) मुंबई, पुणे, नाशिक, औरंगाबाद, लातूर, अमरावती,नागपूर विभाग

२५. प्रादेशिक सहसंचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर

२६.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

२७. जिल्हा नियोजन अधिकारी, (सर्व)

२८. निवड नस्ती.

शासन निर्णय क्र.डिएपी-२०२१/प्र.क्र.८३ /का-१४८१, दिनांक- ३० सप्टेंबर, २०२१ सोबतचे

## <u>परिशिष्ट-अ</u>

### आव्हान निधी (Challenge Fund) करिता मुल्यांकनाचे निकष:-

**१. आयपास (i-PAS ) संगणकीय प्रणालीचा नियमित वापर करणे:- (गुण-१०)**

जिल्हा नियोजन समिती कार्यालयामार्फत योजनांच्या पारदर्शक अंमलबजावणी होण्याकरीता "i-PAS (Integrated Planning Office Automation System)" या संगणकीय प्रणालीची निर्मिती करण्यात आली असून, प्रस्तूत संगणकीय प्रणालीचा वापर सन २०२०-२१ या आर्थिक वर्षापासून अनिवार्य करण्यात आलेला आहे. तरी "स्पर्धा वर्ष (Competition Year)" करीता i-PAS (Integrated Planning Office Automation System) प्रणालीचा १००% वापर करणाऱ्या जिल्ह्यास १० गुण देण्यात यावे. या संगणकीय प्रणालीचा ७५% ते १००% वापर करणाऱ्या जिल्ह्यास ५ गुण देण्यात यावेत व या संगणकीय प्रणालीचा ७५% पेक्षा कमी वापर होत असलेल्या जिल्ह्यास गुण देय होणार नाहीत.

**२. कालबध्द प्रशासकीय मान्यता प्रदान करणे:- (गुण-१०)**

जिल्हा नियोजन समिती कार्यालयामार्फत संनियंत्रित करण्यात येणाऱ्या जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत योजनांना वेळेवर प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने आर्थिक वर्षाच्या सुरुवाती पासून नियोजन होणे अपेक्षित आहे. तरी "स्पर्धा वर्ष (Competition Year)" च्या प्रारंभी ३ महिन्यात म्हणजे दिनांक ३० जून पर्यंत ७५% ते १००% निधीच्या प्रस्तावांना "प्रशासकीय मान्यता" देणाऱ्या जिल्ह्यांना (स्थानिक स्वराज्य संस्थांकडील प्रशासकीय मान्यतांसह) १० गुण तर दिनांक ३० सप्टेंबर पर्यंत ७५% ते १००% निधीच्या प्रस्तावांना "प्रशासकीय मान्यता" देणाऱ्या जिल्ह्यांना ५ गुण देण्यात यावेत. दिनांक ०१ ऑक्टोबर नंतर ७५% ते १००% निधीच्या प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देणाऱ्या जिल्हयांना गुण देय होणार नाहीत.

**३. कार्यक्रम/योजनांवरील खर्च कालबध्द रितीने करणे:- (गुण-१०)**

जिल्हा नियोजन समिती कार्यालयामार्फत संनियंत्रित करण्यात येणाऱ्या जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) तसेच नियोजन विभाग राबवित असलेला आमदार स्थानिक विकास कार्यक्रम (आमदार निधी), डोंगरी विकास कार्यक्रम व मानव विकास कार्यक्रमांच्या अनुषंगाने आर्थिक वर्षात जिल्ह्यास उपलब्ध होणारा निधी विचारात घेउन, कार्यक्रम / योजनांची वेळेवर अंमलबजावणी करून कामे पुर्णत्वावर येणे अपेक्षित आहे. तरी "स्पर्धा वर्ष (Competition Year)" करीता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) व इतर कार्यक्रम/योजनांतर्गत दिनांक ३१ डिसेंबर पर्यत किमान ५०% अथवा त्यापेक्षा जास्त प्रत्यक्ष खर्च करणाऱ्या जिल्हा नियोजन समितीस १० गुण देण्यात यावेत. या अनुसार

दिनांक ३१ डिसेंबर पर्यंत २५% ते ५०% पर्यंत प्रत्यक्ष खर्च करणाऱ्या जिल्हा नियोजन समितीस ५ गुण देण्यात येतील. या कार्यक्रमांचा २५% पेक्षा कमी प्रत्यक्ष खर्च झालेल्या कोणत्याही जिल्हा नियोजन समितीस गुण देण्यात येऊ नये. तसेच याकरीता स्पर्धा वर्षालगतच्या मागील आर्थिक वर्षात स्थानिक स्वराज्य संस्था जसे महानगर पालिका, नगरपालिका व नगरपंचायत तसेच जिल्हा परिषदेकडे वर्ग केलेला १००% निधी दि. ३१ मार्च पर्यंत पूर्णत: खर्च झालेला असणे आवश्यक आहे. उपरोक्त विहित कालावधीनंतर तसेच विहित टक्केवारीपेक्षा कमी खर्च असलेल्या जिल्हा नियोजन समितीस गुण देण्यात येऊ नयेत.

**४. कार्यकारी समितीच्या नियमित बैठका घेणे:- (गुण-१०)**

महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) नियम, १९९९ व महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम २०१८ अन्वये विहीत करण्यात आलेल्या जबाबदाऱ्या पार पाडण्याकरीता जिल्हा नियोजन समितीच्या किमान ४ बैठका आर्थिक वर्षात होणे अपेक्षित आहे. याशिवाय “जिल्हा नियोजन समितीच्या “कार्यकारी समिती”च्या दरमहा किमान १ बैठक महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम २०१८ प्रमाणे होणे अपेक्षित आहे. तरी “स्पर्धा वर्ष (Competition Year)” करीता जिल्हा नियोजन समितीच्या कार्यकारी समितीच्या ७५% ते १००% बैठका आयोजित करणाऱ्या जिल्ह्यास १० गुण तर ५०% ते ७५% बैठका आयोजित करणाऱ्या जिल्ह्यास ५ गुण देण्यात यावेत व ५०% पेक्षा कमी बैठका आयोजित करणाऱ्या जिल्ह्यास गुण देय होणार नाहीत.

**५. निधी वितरण तसेच खर्चाबाबत नियमित आढावा बैठक घेणे (गुण- ०५)**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत “नियंत्रक अधिकारी” म्हणून जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती यांनी जिल्हा वार्षिक योजनेअंतर्गत दरमहा होणारे निधी वितरण व खर्च याबाबत अंमलबजावणी यंत्रणा यांचे नियमित आढावा बैठक घेणे आवश्यक आहे. याअनुषंगाने “जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत मंजूर निधीच्या सरासरी ५ % ते १० %निधीचे दरमहा वितरण व खर्च” झालेला असल्यास संबंधित जिल्हा नियोजन समितीस ०५ गुण देण्यात यावेत, दर- महा सरासरी ३ % ते ५ % निधीचे वितरण व खर्च झालेला असल्यास ०३ गुण देण्यात यावेत अन्यथा या प्रयोजनासाठी गुण देण्यात येऊ नयेत.

**६. आदिवासी घटक कार्यक्रम, आदिवासी घटक कार्यक्रम बाह्य कार्यक्रम व अनुसूचित जाती घटक कार्यक्रम या कार्यक्रमांची अंमलबजावणी करणे:- (गुण-१०)**

जिल्हा नियोजन समिती अंतर्गत (i) आदिवासी घटक कार्यक्रम , (ii) आदिवासी घटक कार्यक्रम बाह्य कार्यक्रम व **(iii)** अनुसूचित जाती घटक कार्यक्रम या कार्यक्रमांतर्गत निधी उपलब्ध करुन दिला जातो. (i) आदिवासी घटक कार्यक्रम , (ii) आदिवासी घटक कार्यक्रम बाह्य कार्यक्रम व

**(iii)** अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत प्राप्त निधीबाबत स्पर्धा वर्षात (Competition Year) जिल्ह्यास उपलब्ध झालेल्या निधीतील १००% निधी, त्याच आर्थिक वर्षात प्रत्यक्ष खर्च करणे" या निकषावर संबंधित जिल्हा नियोजन समितीस १० गुण देण्यात येतील. प्राप्त झालेल्या निधीपैकी ७५% ते १००% दरम्यान निधी खर्च केलेला असल्यास ०५ गुण देण्यात यावेत. स्पर्धा वर्षात (Competition Year) प्राप्त निधी पैकी ७५ % पेक्षा कमी खर्च झालेला असल्यास गुण देण्यात येऊ नयेत.

**७. आमदार स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रम संदर्भात आढावा बैठका घेणे :-(गुण-१०)**

आमदार स्थानिक विकास कार्यक्रम अंतर्गत प्रधान्याने प्रशासकीय मान्यता प्राप्त होऊन आर्थिक वर्षा अखेर निधी सर्मपित होऊ नये या करीता जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव यांनी दर महिन्याला अंमलबजावणी यंत्रणांची एक आढावा बैठक घेणे अपेक्षित राहील. जिल्हास्तरावर ७५% ते १००% बैठका आयोजित करणा-या जिल्हा नियोजन समितीस १० गुण देण्यात यावेत. तसेच, जिल्हास्तरावर ५०% ते ७५% बैठका आयोजित करणा-या जिल्हा नियोजन समितीस ०५ गुण देण्यात यावेत. व ५०% पेक्षा कमी बैठका घेणा-या जिल्हा नियोजन समितीला गुण देण्यात येऊ नयेत.

**८. सूक्ष्म प्रकल्प राबविणे:- (गुण-१०)**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत शाश्वत विकास ध्येये (Sustainable Development Goals) गाठण्यासाठी जिल्ह्यातील स्थानिक परिस्थितीनूरूप नाविण्यपूर्ण दृष्टीकोन (Innovative Approach) विकसित करणे अपेक्षित असून त्याअनुषंगाने "सूक्ष्म प्रकल्प (Micro Projects)" राबविणे अनिवार्य आहे. तरी स्पर्धा वर्षात (Competition Year) उत्कृष्ट प्रकारे ५ "सुक्ष्म प्रकल्प (Micro Project)" पुर्ण करणाऱ्या जिल्ह्यांना १० गुण व ३ ते ५ सुक्ष्म प्रकल्प पूर्ण करणाऱ्या जिल्ह्यांना ५ गुण व ३ पेक्षा कमी सुक्ष्म प्रकल्प (Micro Project) पूर्ण करणाऱ्या जिल्ह्यांना गुण देण्यात येऊ नयेत.

**९. निधीचे मर्यादित पुनर्विनियोजन करणे:- (गुण-१०)**

"जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत मंजूर निधीच्या ५ टक्के निधीचे ३१ डिसेंबर पर्यंत व कमाल १० टक्के निधीचे ३१ मार्च पर्यंत अंतिमत: पुनर्विनियोजन करण्यात आलेले असल्यास संबंधित जिल्हा नियोजन समिती कार्यालयास १० गुण देण्यात यावेत. मंजूर निधीच्या ५% ते १०% निधीचे ३१ डिसेंबर पर्यंत व कमाल १० टक्के निधीचे ३१ मार्च पर्यंत अंतिमत:पुनर्विनियोजन करणाऱ्या जिल्हा नियोजन समितीला ५ गुण देण्यात यावेत व १० % पेक्षा जास्त निधीचे पुनर्विनियोजन केल्यास गुण देण्यात येऊ नयेत.

**१०. विनियोजन लेख्यांचा निपटारा कालमर्यादेत करणे :- (गुण-५)**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबविण्यात येणा-या सर्व योजनांचे बाबतीत विनियोजन लेखे “प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी) मुंबई/नागपूर” यांचेकडून पाठविण्यात येतात. त्यामध्ये तपशीलवार विनियोजन लेखे व खर्चाची माहिती” उपलब्ध करून देण्यात येते. प्रधान महालेखापाल मुंबई/नागपूर यांनी “अंतिम सुधारीत तरतूद” यामध्ये दर्शविलेली तरतूद व “खर्चाची माहिती” तपासून त्यासंदर्भातील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने/चूकीच्या नोंदी दुरुस्तीचा प्रस्ताव सादर करण्याबाबत कळविण्यात येते. या अनुषंगाने स्पर्धा वर्षात(Competition Year) जिल्हा नियोजन समिती कार्यालयांकडे प्राप्त होणाऱ्या प्रारूप “विनियोजन लेखे” संदर्भात उचित कार्यवाही करून ते स्पष्टीकरणासह पुढील ३ महिन्यात राज्य शासनाकडे सादर करणे अपेक्षित आहे. तरी स्पर्धा वर्षा (Competition Year) लगतच्या पुर्वीच्या वर्षातील “विनियोजन लेखे” बाबत दिनांक ३१ डिसेंबर पर्यंत परिपूर्ण निपटारा झालेला असल्यास जिल्हा नियोजन समितीस ०५ गुण देण्यात यावेत. दिनांक ३१ डिसेंबर नंतर परंतु पुढील वर्षाच्या ३१ मार्च पर्यंत “विनियोजन लेखे”निपटारा करणाऱ्यांना ०३ गुण व तद्नंतर निपटारा करणाऱ्या जिल्हयांना गुण देय होणार नाहीत.

**११. लेखापरिक्षण अनुपालन अहवाल सादर करणे :- (गुण-१०)**

जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) सह इतर सर्व कार्यक्रम/योजनांचे, प्रधान महालेखापाल, मुंबई/नागपूर यांचेकडून दरवर्षी लेखापरिक्षण करण्यात येते. त्यामध्ये लेखापरिक्षण पथकाकडून निरीक्षणे/आक्षेप नोंदविले जातात. या अनुषंगाने “स्पर्धा वर्षात (Competition Year) संबंधित जिल्हा नियोजन समिती कार्यालयात झालेल्या लेखापरिक्षणात उपस्थित केलेल्या निरीक्षणे / आक्षेपांबाबत उचित कार्यवाही करून त्या पुढील ३ महिन्यात अनुपालन अहवाल सादर करून त्यांचा निपटारा करणे” तसेच “स्पर्धा वर्षापूर्वीच्या (Competition Year) लगतच्या वर्षातील लेखापरिक्षण आक्षेपांचा परिपूर्ण निपटारा झालेला असणे” या अनिवार्य निकषावर आधारीत गुण देण्यात यावेत. त्यानुसार स्पर्धा वर्षात (Competition Year) लेखापरिक्षण पथकाने नोंदविलेल्या निरिक्षणे/ आक्षेपांपैकी ७५% ते १००% आक्षेपांचे अनुपालन अहवाल, वर विहित केलेल्या कालावधीत सादर केलेले असल्यास आणि स्पर्धा वर्षापूर्वीच्या (Competition Year) लगतच्या वर्षातील आक्षेपांचा १००% निपटारा करण्यात आलेला असल्यास जिल्हा नियोजन समितीस १० गुण देण्यात यावेत. तर स्पर्धा वर्षातील (Competition Year) ५०% ते ७५% निरिक्षणे/ आक्षेपांचे अनुपालन अहवाल, वर विहित केलेल्या कालावधीत सादर केलेले असल्यास आणि स्पर्धा वर्षापूर्वीच्या (Competition Year) लगतच्या वर्षातील आक्षेपांचा १००% निपटारा करण्यात आलेला असल्यास ०५ गुण देण्यात यावेत. ५०% पेक्षा कमी निरिक्षणे/ आक्षेपांचे अनुपालन अहवाल, वर विहित केलेल्या कालावधी नंतर सादर केलेले असल्यास जिल्हा नियोजन समितीस गुण देण्यात येऊ नयेत.

---------o---------